मुख्याधिकारी गट-अ संवर्गातून मुख्याधिकारी गट-अ (निवडश्रेणी) संवर्गात तात्पुरती पदोन्नती व पदस्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमसीओ-२०२२/प्र.क्र.३४/नवि-१४**
**मंत्रालय (मुख्य इमारत), चौथा मजला,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक: २५ एप्रिल, २०२२.**

**संदर्भ:-** महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१ दि.१४.०७.२०२१.

**शासन आदेश:-**

खालील नमुद अधिकाऱ्यांना मुख्याधिकारी गट-अ (एस-२० रु.५६१००-१७७५००) संवर्गातून मुख्याधिकारी गट-अ (निवडश्रेणी) (एस-२३ रु.६७७००-२०८७००) संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देऊन त्यांना संदर्भाधिन अधिसूचनेच्या अनुषंगाने वाटप झालेल्या महसूली विभागांतर्गत त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे: -

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | वाटप महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | श्री.सुनिल लक्ष्मण लहाने, आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका. | औरंगाबाद | **आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका या कार्यरत पदावर.** |
| २. | श्री.चंद्रकांत शिवाजी खोसे, जिल्हा प्रशासन अधिकारी, पुणे. | पुणे | **अतिरिक्त आयुक्त, सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका.** |
| ३. | श्री.चंदन प्रभू पाटील, जिल्हा प्रशासन अधिकारी, भंडारा. | नागपूर | **उपायुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.** |
| ४. | श्री.गणेश पांडुरंग गिरी, उपायुक्त, धुळे महानगरपालिका. | नाशिक | **अतिरिक्त आयुक्त, मालेगांव महानगरपालिका.** |
| ५. | श्री.सौरभ जोशी, उपायुक्त, औरंगाबाद महानगरपालिका. | कोकण-२ | **उपायुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.** |
| ६. | श्री.हर्षल गायकवाड, मुख्याधिकारी, रामटेक नगरपरिषद, जि.नागपूर. | अमरावती | **अतिरिक्त आयुक्त, अमरावती महानगरपालिका.** |

२. उपरोक्त पदोन्नती ही खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे: -

(१) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून सामान्य प्रशासन विभाग(का.१६-ब), शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतूदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहुन सदर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

(२) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने, या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(३) पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/कार्या-१२, दि.१२.०९.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयामधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(४) संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी पदोन्नत अधिकाऱ्यांस तात्काळ कार्यमुक्त करावे. पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर रुजू होऊन, तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२५१७२४४१७७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Digitally signed by C Priyanka
Date: 2022.04.25 17:26:57 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व संबंधित विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
३. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
४. सर्व संबंधित महानगरपालिका महापौर.
५. सर्व संबंधित महानगरपालिका आयुक्त.
६. सर्व संबंधित नगरपरिषद नगराध्यक्ष.
७. सर्व संबंधित नगरपरिषद मुख्याधिकारी.
८. सर्व संबंधित मुख्याधिकारी गट-अ

**प्रतिलिपी,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (नवि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (नवि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (नवि-१)/(नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
८. निवडनस्ती (नवि-१४)